**सातारा येथील मंजूर शासकीय वैद्यकीय महाविद्यालयासाठी महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळाची जागा कायमस्वरुपी हस्तांतरित करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधिद्रव्ये विभाग,
शासन निर्णय क्रमांक: एमईडी-२०१३/प्र.क्र.२११/१३/शिक्षण-१,
९ वा मजला, गो.ते. रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
दिनांक:-२२ जून, २०१८

वाचा: शासन निर्णय, क्र. एमईडी-२०१०/प्र.क्र.७६(अ)/२०१०/शिक्षण-१,
३१ जानेवारी २०१२.

**प्रस्तावना :**

सातारा येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व ५०० रुग्ण खाटांचे संलग्नित रुग्णालय सुरु करण्यास वाचा येथील शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात आली आहे. सदर नियोजित शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाकरिता प्रथम जिल्हाधिकारी यांच्या ताब्यातील मौजे माहुली येथील गायरान जागा निश्चित करण्यात आली होती. परंतू सदर जागा सातारा शहरापासून सुमारे १० कि.मी अंतरावर असल्याने महाविद्यालय व रुग्णालयाकरिता गैरसोयीची आहे. त्यामुळे कृष्णानगर, सातारा येथील महाराष्ट्र कृष्णा खोरे महामंडळ, पुणे यांच्या ताब्यातील जागा हस्तांतरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

त्यानुषंगाने सदर प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. त्यास दिनांक २९ मे, २०१८ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

सातारा येथील मंजूर शासकीय वैद्यकीय महाविद्यालयासाठी महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे यांची कृष्णानगर, सातारा येथील २५ एकर जागा विनाअट व विनामूल्य वैद्यकीय शिक्षण विभागास कायमस्वरुपी हस्तांतरित करण्यास याद्वारे शासन मान्यता देत आहे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५९/२०१८/व्यय-१३, दिनांक २८.०३.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२२१२१२५०५९१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrinivas P. Kotwal

Digitally signed by Shrinivas P. Kotwal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education And Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d32b061d22e577cf43207f6a86cadc4ce1798644845edd3b3fb5ef54c3051c62, cn=Shrinivas P. Kotwal
Date: 2018.06.22 13:33:30 +05'30'

**(डॉ.श्रीनिवास पुं.कोतवाल)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री (जलसंपदा व वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व मंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७) मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधानभवन, मुंबई
८) मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधानभवन, मुंबई
९) सर्व राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
११) प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) सचिव, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार, निर्माण भवन, नवी दिल्ली.
१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१४) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
१५) संचालक, आयुष संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
१७) कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक.
१८) जिल्हाधिकारी, सातारा,
१९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ / २ महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
२०) जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
२१) जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, सातारा
२२) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
२४) निवडनस्ती (शिक्षण १)